शासकीय परिवहन सेवा, वरळी कार्यालयाकरिता एक अधिसंख्य पद निर्माण करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- शापसे- ३४२०/३०/प्र.क्र.०४/३१ (शापसे)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक:- २९.०७.२०२०

संदर्भ :-१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र. ३८/१६-ब, दि.२१.१२.२०१९
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.बीसीसी-२०२०/प्र.क्र. १८७ अे/१६-ब, दि.३०.०६.२०२०
३) नियंत्रक, शासकीय परिवहन सेवा, वरळी यांचे पत्र क्र.शापसे/प्रशा/२०२०/०६, दि.०९.०१.२०२०

**प्रस्तावना :**

मा.सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपिल क्र. ८९२८/२०१५ (चेअरमन ॲन्ड मॅनेजिंग डायरेक्टर, एफसीआय आणि इतर विरुद्ध जगदीश बहिरा व इतर) यामध्ये दि.६ जुलै, २०१७ रोजी मागास जातींना असलेल्या आरक्षणाच्या आधारे शासकीय सेवेत दाखल झालेल्या व त्यानंतर जातीचे दावे अवैध ठरलेल्या व्यक्तींना शासकीय सेवेत संरक्षण देय ठरत नाही, असा निर्णय दिला आहे. मा.उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ, नागपूर यांची रिट याचिका क्र.३१४०/२००८ मध्ये दि.२८.०९.२०१८ च्या आदेशान्वये माननीय सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाची अंमलबजावणी करण्यासंदर्भात योग्य ते आदेश निर्गमित करण्याची बाब या विभागाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय -:**

१. शासकीय परिवहन सेवा कार्यालयातील श्री.नि.प.केणी, नोंदणी लिपिक, गट-क यांनी अनुसूचित जमातीचे जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्याने दि.२१.१२.२०१९ पासून त्यांच्या सेवा अधिसंख्य पदावर वर्ग करण्यासाठी शासकीय परिवहन सेवा कार्यालयात तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यांकरीता किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत नोंदणी लिपिक, गट-क हे एक अधिसंख्य पद निर्माण मान्यता देण्यात येत आहे.

२. अधिसंख्य पदाच्या वेतनावर होणारा खर्च हा संबंधित अधिकारी / कर्मचारी सध्या ज्या कार्यालयात कार्यरत आहे, त्या कार्यालयाच्या वेतनासंबंधीच्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधित वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभागाच्या क्र.बीसीसी २०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१.१२.२०१९ व क्र.बीसीसी २०२०/प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि.३०.०६.२०२० रोजीच्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२००७२९१७४२४९१७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने ,

ARUN VISHNUPANT JOSHI

Digitally signed by ARUN VISHNUPANT JOSHI
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=25b1cd893dfd4dc594def1c4642465ecdafbdae899f879d9b4603fe37cfb3598, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=7f0220f1418de280ee59330c50f6cf32874048e40feb0d8d5e96bc96330d791f, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ARUN VISHNUPANT JOSHI
Date: 2020.07.29 17:16:22 +05'30'

**( अ. वि. जोशी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति ,**

१. प्रधान सचिव (राजशिष्टाचार), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
३. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (राज्यपालांचे सचिव कार्यालयामार्फत)
५. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
६. नियंत्रक, शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई
७. वित्त विभाग, व्यय-४, अर्थसंकल्प-१४, वित्तीय सुधारणा, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ .
८. कार्यासन क्रमांक २५, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. निवड नस्ती.